भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी वितरीत करणेबाबत .. (२४०१ A८८९)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र.८३/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २८ मार्च, २०२५

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.७.२०१८
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र. १८७/९-अे, दि.२१.०९.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र. ८३/९-अे, दि.१९.०६.२०२४
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२४/प्र.क्र. ८३/९-अे, दि.१४.१०.२०२४
५) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/भाफुंफलायो/नि.मा./२४-२५/१८८७/२०२५, दिनांक २९.०१.२०२५
६) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/भाफुंफलायो /नि.मा./३४७३/२०२५, दिनांक १४.०२.२०२५
७) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त **संदर्भ क्र. १** येथील शासन निर्णयान्वये भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. सदर योजनेअंतर्गत **संदर्भ क्र. २** येथील शासन निर्णयान्वये सुधारित मापदंडांना मंजूरी देण्यात आली आहे. तसेच उक्त योजनेची सन २०२४-२०२५ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेल्या एकूण रु. १०४५०.०० लाख (रुपये एकशे चार कोटी पन्नास लाख फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास **संदर्भ क्र. ३** येथील प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच, योजनेंतर्गत **संदर्भ क्र. ४** येथील शासन निर्णयान्वये रु. ३५४७.०६ लाख निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संचालक (फलोत्पादन) यांनी **संदर्भ क्र. ५ व ६** येथील पत्रांन्वये पुढील निधी वितरणाकरीता प्रस्ताव सादर केले आहेत. त्यास अनुलक्षून भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) राज्यात भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड या योजनेची सन २०२४-२५ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा रु. ३४५२.९४ लाख (रुपये चौतीस कोटी बावन्न लाख चौऱ्याण्णव हजार फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.
२) उक्त निधीतून सुरुवातीला सन २०२३-२४ मधील दायित्व अदा करण्यात यावे. तद्नंतर उर्वरित निधी सन २०२४-२५ मधील अनुदानासाठी खर्च करण्यात यावा.

३) सदरचा निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.
मागणी क्र. डी-३
२४०१- पिक संवर्धन
११९, बागायती व भाजीपाला पिके,
(०१) (३३), भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना (कार्यक्रम),
३३-अर्थसहाय्य, (२४०१ A८८९)

४) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५) सदर योजनेची संदर्भ क्रमांक १ व २ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच वेळोवेळी केलेल्या सुधारणाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करावी.

६) संचालक (फलोत्पादन) यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा आढावा वेळोवेळी घ्यावा व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषी) यांचेमार्फत शासनास सादर करावा.

७) सदर योजनेंतर्गत निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८) सदर आदेश वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील अटी व शर्तीचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९) सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४०/का १४३१, दिनांक २१.०३.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२७/२०२५/व्यय-१, दिनांक २७.०३.२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२८१९१९१३१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VRUSHALI YOGESH SANGLE

Digitally signed by VRUSHALI YOGESH SANGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=38340178b558138729554a37a04d3127c1c97082ed3e433b6459142735a1fba3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3FFC4F6688129303EDCA6D1ABD7CED0BC33A45451BD4D2FA7BE02E7363B75969, cn=VRUSHALI YOGESH SANGLE
Date: 2025.03.28 19:20:33 +05'30'

**( वृषाली सांगळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
५) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) प्रधान सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१०) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१४) सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
१६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१९) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -४०० ०३२.
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१) कक्ष अधिकारी (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२) कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२४) निवड नस्ती/९-अे.